“३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा” निमित्त “छत्रपती संभाजीराजे” यांचे स्पेशल कव्हर व पोस्ट तिकीट अनावरण करण्याकरीता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३/प्र.क्र. ३६१/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२४

**वाचा :** १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २२ मे,२०२३
२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय समक्रमांक, दिनांक ४ ऑगस्ट,२०२३
३. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १८ जानेवारी,२०२४
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे क्र. सांकास /१७५८, दिनांक २६ मार्च, २०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या राज्याभिषेक वर्षानिमित्त “शिवराज्याभिषेक महोत्सव” दिनांक २ जून २०२३ पासून सुरू झाला आहे. त्यानुषंगाने राज्यामार्फत विविध कार्यक्रम व उपक्रम राबविण्यात येत आहेत. त्याच पार्श्वभुमीवर छत्रपती शिवाजी महाराज यांच्या जीवनाशी निगडीत व्यक्ति/स्थळे/घटना/कार्यक्षेत्र इ. बाबी विशद करणारी “विशेष पोस्ट कव्हर/तिकीट” यांचे अनावरण करण्याकरीता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“३५० वा शिवराज्याभिषेक महोत्सव” निमित्त छत्रपती संभाजीराजे यांचे स्पेशल कव्हर व पोस्ट तिकीट यांचे अनावरण करण्यासाठी येणारा खर्च रुपये १२,६८,०००/- (अक्षरी रुपये बारा लक्ष अडुसष्ट हजार फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, मुख्य लेखाशीर्ष २२०५ कला व संस्कृती, (१०२) कला व संस्कृती, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम, (२२०५ ३७३३) ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२९१४१६३२०७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MAHESH KISAN WAVHAL

Digitally signed by MAHESH KISAN WAVHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=495C75B4C173C81F308BD63A1B33A5DA4EA131ED182D44EA1B502AB4662E9810, cn=MAHESH KISAN WAVHAL
Date: 2024.03.29 14:26:38 +05'30'

**( महेश किसन वाव्हळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव ( सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२. निवड नस्ती, सां.का.४.